**महाराष्ट्र शासन,**
**वित्त विभाग,**
**शासन निर्णय,क्रमांक : अरजा २४०२/प्र.क्र.५९/सेवा-८**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक : १४ मे, २००४.**

संदर्भ : (१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अरजा २४०२/२५/सेवा-८, दि. ७ ऑक्टोबर, २००२.
(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक अरजा २४०२/२५/सेवा-८, दि. २५ ऑगस्ट, २००३.

शासन निर्णय :- शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक अरजा २४०२/२५/सेवा-८, दिनांक ७ ऑक्टोबर, २००२ अन्वये शासकीय कर्मचाऱ्यांना " विशेष असाधारण रजा योजना " लागू करण्यात आली आहे. या योजनेच्या लाभार्थींना विशेष असाधारण रजा मंजूर करण्यात आल्यावर, मंजूर रजेला जोडून सलग वाढीव असाधारण रजा मंजूर करण्याबाबतचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

शासन आता असे आदेश देत आहे की, विशेष असाधारण रजा योजनेचा लाभ घेणाऱ्या अधिकारी/ कर्मचारी यांनी त्यांच्या वाढीव रजेची मागणी केल्यास त्यांना प्रशासकीय सोय लक्षात घेवून सलग वाढीव असाधारण रजा मंजूर करण्यात यावी व त्यांनी या योजनेंतर्गत एकदाच लाभ घेतला आहे असे समजण्यात यावे. मात्र, संपूर्ण विशेष असाधारण रजेचा कालावधी ५ वर्षापेक्षा अधिक होऊ नये. तसेच, दोन वेगवेगळ्या कालावधीसाठी या योजनेंतर्गत रजा मंजूर करता येणार नाही. शा.नि.वि.वि. क्रमांक अरजा १४०२/२५/सेवा-८, दि.७ ऑक्टोबर, २००२ मधील परि.१(५) ची तरतूद या आदेशान्वये सुधारण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**शुभदा कारेकर**
**शासनाचे उप सचिव**

प्रति,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल (वाणिज्य लेखापरीक्षा), मुंबई ,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (५ प्रती),
मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व अपर मुख्य सचिव, प्रधान सचिव व सचिव, मंत्रालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, महाराष्ट्र राज्य, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
मुख्य लेखापरीक्षा अधिकारी, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
राज्यपालांचे सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयाच्या निरनिराळया विभागांच्या अधिकाराखाली असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
वित्त विभागातील सर्व कार्यासने, (ग्रंथपाल ५ प्रती),
निवड नस्ती - कार्यासन सेवा-८.वित्त विभाग.

---

* पत्राने.

---

शेठा प्रिंट/एप-42(12,000+20-5-04).